अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली राष्ट्रीय वस्त्रोद्योग महामंडळाच्या मुंबईतील गिरण्याचे राज्यातील कापूस उत्पादन क्षेत्रात स्थलांतर करणेसाठी संनियंत्रण समितीची स्थापना करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१५/प्र.क्र.१४/टेक्स-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०९ फेब्रुवारी, २०१५

वाचा :

१) मा.मुख्यमंत्री महोदयांच्या दि. ३०.०१.२०१५ रोजी दु. ३.०० वाजता आयोजित केलेल्या बैठकीचे इतिवृत्त

प्रस्तावना :

राष्ट्रीय वस्त्रोद्योग महामंडळाच्या मुंबईमध्ये असलेल्या गिरण्या अडचणीत असून विविध कारणामुळे बंद होण्याच्या मार्गावर आहेत.तसेच ८ गिरण्या बंद झाल्या आहेत.ही बाब लक्षात घेऊन राज्यातील कापूस उत्पादित क्षेत्रात रोजगाराच्या संधी उपलब्ध करून या भागाचा विकास करण्यासाठी सदर गिरण्या त्या क्षेत्रात वस्त्रोद्योग स्थापित करणे आवश्यक आहेत. यासाठी येणा-या अडीअडचणी सोडविण्यसाठी व समन्वय करण्यासाठी अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली राष्ट्रीय वस्त्रोद्योग महामंडळाच्या मुंबईतील गिरण्याचे राज्यातील कापूस उत्पादन क्षेत्रात स्थलांतर करणेसाठी संनियंत्रण समितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय वस्त्रोद्योग महामंडळाच्या मुंबईमध्ये असलेल्या बंद गिरण्या व बंद होण्याच्या मार्गावर आहेत अश्या गिरण्या नांदगाव पेठ,अमरावती व राज्यातील इतर कापूस उत्पादित क्षेत्रात स्थलांतर करणेसाठी अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली संनियंत्रण समितीची स्थापना कण्यात येत आहे.

सदर समितीची रचना खालीलप्रमाणे आहे..

१. अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग) - अध्यक्ष
२. मुंबई महानगर पालिका आयुक्त- सदस्य
३. प्रधान सचिव (उद्योग) - सदस्य
४. सचिव (कामगार) - सदस्य
५. आयुक्त (कामगार) - सदस्य
६. मुख्य सर व्यवस्थापक (पश्चिम विभाग),
राष्ट्रीय वस्त्रोद्योग महामंडळ, मुंबई - सदस्य

सदर गिरण्या कापूस उत्पादक क्षेत्रात स्थलांतर करणेसाठी येणा-या विविध अडीअडचणी सोडविण्यसाठी उपरोक्त समिती समन्वय करेल.

सदर समितीने प्रत्येक महिन्याला आढावा बैठक घेऊन अहवाल मा.मुख्यमंत्री महोदयांना सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२७१३१९३३०९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anand Arjun Mali

Digitally signed by Anand Arjun Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anand Arjun Mali
Date: 2015.02.27 13:31:20 +05'30'

(आ.अ.माळी)
कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
२) अपर मुख्य सचिव(वस्त्रोद्योग),मंत्रालय,मुंबई-३२
३) प्रधान सचिव,नगरविकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
४) प्रधान सचिव (उद्योग), मंत्रालय,मुंबई-३२
५) सहसचिव,वस्त्रोदेयोग विभाग,उद्योग भवन,केंद्र शासन,नवी दिल्ली
६) सचिव(कामगार) मंत्रालय,मुंबई-३२
७) आयुक्त,मुंबई महानगरपालिका,मुंबई.
८) मुख्य सर व्यवस्थापक,राष्ट्रीय वस्त्रोद्योग महामंडळ, मुंबई
९) मा. मंत्री /राज्यमंत्री (वस्त्रोद्योग), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
१०) संचालक,वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.